# हृद्गत

वाङ्मयाच्या राजमार्गावर प्रस्तावनेच्या पाऊल वाटेनें येणें सोईचें असतें व तशी वाट मलाहि धरतां आली असती, परंतु अंतरंगाला प्रस्तावना ती काय करावयाची? अंतरंगाची ओळख अंतरंगालाच पटावयाची तेथें प्रस्तावनेची मध्यस्थी कशाला? आणि म्हणूनच मी आपलें अंतरंग रसिकांसमोर सरळ उघडें केलें आहे. रसिक वाचक त्याच्याकडे आपुलकीच्या भावनेनें पाहील अशी अल्प आशा धरली तर ती अस्थानीं होणार नाहीं असा भरंवसा वाटतो.

माझी कविता पुस्तक रूपानें संकलित व्हावी अशी माझ्या अनेक मित्रांची इच्छा होती. त्यांत 'नवजीवन' व 'सुवर्ण' मासिकांचे संपादक रा. रा. नारायणराव मोरे, वि. रं. कुळकर्णी, कविद्वय कारखानीस, द. ग. जयवंत, म. बा. कुळकर्णी व रा. भ. सबनीस, यांचा सप्रेम उल्लेख केला पाहिजे.

ठाणें येथील रा. भ. दि. गांगल व विशेषतः "बहर"कर्ते कवि वसंत यांनीं मला जें अनेक प्रकारें साहाय्य केलें त्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे.

अंतरंगाचें मुद्रण सद्भक्तीत व्हावें हा संयोग अपूर्व होय. त्या कामीं प्रेसचे मॅनेजर रा. वि. ग. शेंबेकर यांनीं अत्यंत शीघ्र व सुबक पुस्तक छापून दिलें याबद्दल त्यांचा व माझ्या इतर अनेक मित्रांचा व सुहृदांचा मी आभारी आहें.

डोंबिवली,
१४-४-३८.

रसिकांचा कृपाभिलाषी,
शंकर राजाराम सबनीस

# परिचय

काव्याशीं अपरिचित असणाऱ्यांनें कवीचा परिचय करून देण्याचा प्रसंग क्वचितच असेल. पण दरबाराची सुरुवात भालदारा-च्याच ललकारीनें होत असते. शिवाय हा परिचय करून देण्याचा आग्रह केवळ प्रेमामुळेंच आहे व त्याचा संबंध काव्याशीं असण्या-पेक्षां तें निर्मित्याशीं आहे.

प्रस्तुत कवीला अगदीं लहानपणापासून ओळखणाऱ्यांपैकीं मी एक आहें. स्वतःची सृष्टी स्वतंत्रपणानें निर्माण करून तिच्यांत वावरणाऱ्या दुर्मिळांमध्यें त्यांची गणना करितां येईल.

सर्वसाधारणपणें डॉक्टरीचा धंदा काव्याला पोषक समजला जात नाहीं परंतु प्रस्तुत कवि हे स्वतः डॉक्टर असूनहि त्यांना दोन्हीं साधलें–साधतें. दुःखितांबद्दल वाटणारी कळकळ व सहृदयता हीं अंतःकरण सागरांत उठणारीं एकाच प्रकारचीं आंदोलनें आहेत. यशस्वी डॉक्टरचें रहस्य म्हणजे त्याला वाटणारा दुःखितांबद्दलचा कळवळा हेंच होय आणि कवीचें सर्व भांडवल त्याची सहृदयता. मग कळकळीचा डॉक्टर उत्तम कवी कां होणार नाहीं ?

शून्यांतून सृष्टी निर्माण करणाऱ्या अव्यक्त ब्रम्हाचे व्यक्त अवतार म्हणजेच कवी. अंतरंगाच्या सहस्रशः उठणाऱ्या वृत्तींना प्रत्यक्ष स्वरूप देवून व्यक्त विश्वाचा अव्यक्ताशीं सहज संबंध जोडून देणारेही तेच. अदृश्य भावना चालत्या बोलत्या करणारे जर कवी, तर निराकाराला आकार देवून सौंदर्याच्या सजावटीनें सुशोभित करणारे ते कलावंत असा कवि व कलावंत यांत सह्याचा फरक दाख-विण्यांत येतो, या दृष्टीनें पाहतां श्री. सबनीस हे अंतर्बाह्य कलावंत आहेत.

पण भ्रमराचा गुंजारव ऐकण्यास गोड असला तरी भृंगाची प्रत्यक्ष संगती केवळ मधुपानापुरतीच असते. श्री. सबनीस अंतरंग-कमलांतील मधु लुटणारे नुसतेच भृंग नाहींत तर त्यांच्या मैत्रींत, त्यांच्या प्रेमांत रहता आहे हा अनुभव त्यांच्या अनेक मित्रांना आलेला आहे.

या पूर्वींच श्री. सबनीसांचा एखादा काव्यसंग्रह केव्हांच प्रसिद्ध व्हावयास पाहिजे होता. परंतु त्यांचा व्यवसाय व इतर कौटुंबिक अडचणी यांमुळें तो आजवर लांबणीवर पडला. आतां तो प्रसिद्ध होत आहे तरी त्यामुळें त्यांच्या अनेक मित्रांस आनंद तर होईलच पण रसिकानांही तो आनंदवील यांत संदेह वाटत नाहीं.

हायकोर्ट, मुंबई.
१४-४-३८.

दत्तात्रय विनायक सबनीस.

# अनुक्रमणिका



---

# अंतरंग

क्षणोक्षणीं उठले हृदयीं भावनातरंग
आणि तयें कंपित केलें मदिय अंतरंग.

उल्हसिता वृत्ती केव्हां होत मनोभंग
क्षुब्ध चित्त होई किंवा शांतता अभंग
भावचित्र रेखित झाले भरुनि शब्दरंग

तेंच तुम्हांपुढती केलें खुलें अंतरंग.

# उषा

ध्वांता दूर करी, प्रकाश पसरी, आनंद देई मना,
शांतीचा रस पाझरोनि वरुनी आल्हादवी जीवना,
आहे तीच उषा इथें, उधळिते हास्यप्रभाचंद्रिका
झाली हृत्कलिका प्रफुल्ल गमला स्वर्लोक मातें निका.

# वसंत

मधुमास वास करि हृदंतरीं
वल्लरी विलसते वनान्तरीं.

अथांग भरलें तडाग सुंदर,
किरण स्वर्णमय पसरी दिनकर,
प्रतिबिंबित हो असंख्य तरुवर,
लवले फुलुनी तटावरी.

आम्रतरूची छाया शीतल,
परागशय्या खालीं कोमल,
मरंद निथळत वरुनी अविरल,
कोकिल कूजिति तरु शिखरीं.

निजपदयुगुलां सलीलांतरीं
टाकुन बसली तटीं सुंदरी,
सौंदर्याचें वाहत वारी–
तेंच सांठलें सरोवरीं.

पदकमलांतें सलिलिं निरखुनी
अलिगण धांवत नलिनी त्यजुनी
संभ्रमेंच परि जाइ गुंगुनि
वदन पंकजा बघुनि वरी.

तांबुस कोठें हिरवी पिवळी
आम्रमंजिरी कर्णि खोंविली,
वनकुसुमांची माळा रुळली,
कुंदकळ्या कुंतलांतरीं.

मंद समीरण पल्लव डुलवी,
नवोविकच-कच-कुसुमा डुलवी,
सांध्य-रवीकर चुंबुनि खुलवी,
अधरपंक्ति पोवळयापरी.

वनपवनाचा स्वन मधु मंजुळ,
मधुरालापा घेई कोकिळ,
किशोर निर्झर वाहे झुळझुळ,
संगम त्यांचा हिच्या स्वरीं.

सिंहकटी गुरु नितंब वेष्टित
गौरतनू नीलांबर झांकित
सुरम्य कांती आंतुन फांकत
चंद्रिकाच कीं ढगांतरीं!

यौवनभारें लवली किंचित
मन्मथविव्हल तनु हो विगलित
लोल लोचनें अर्धोन्मीलित
हृदयीं चिंतित कुणातरी.

# पारिजातक

प्रभात काळीं प्रशांत वेळीं तरु हा फुललेला
पाहुन फुललें, मानस चाले गुंफित ही माला.

गगनतारका नाचुन नाचुन झाल्या का श्रांत
विश्रांतीस्तव बसून करीती गुजगोष्टी येथ!

नाथदर्शनें हर्षित होउन मांडी श्रृंगार
रत्नकरंडक उघडुन रजनी लेत अलंकार!

नाथासंगें प्रेमालापीं जेव्हां मग हंसली
त्या हास्याची प्रभा फांकली काय तिच्या गालीं!

रत्नखचित वस्त्राचा घेउन पदर शिरावर ही
कोणी अभिसारिका युवाची कुण्या वाट पाही!

किंवा वदनावरुन घेउनी बुरखा विनयानें
कुलवंताची कुणी कामिनी चाले मार्गानें!

कीं तिमिराच्या शांत सागरा आली ही भरती
तीरावरती फेनयुक्त या ऊर्मि उसळताती!

लपंडाव वा खेळत असता वृक्ष लता बाळें
हास्य फांकलें या वृक्षाचें, खुदकन् जाई आलें.

अरुण उषा चिन्हांकित असती पुष्पें ज्यावरती
रविरायाची ध्वजाच का ही येथें फडफडती!

पुष्पें पडती टप टप वरुनी खालीं भूवरती
विद्रुम मौक्तिक माला का ही वाटे ओघळती!

सागर मंथुन वरी काढिल्या रत्नांतिल देख
विलसत आहे रत्न अमोलिक अवनीवर एक!

# दिपवाळी

आली आली मंगलमय ही दिपवाळी आली,
हर्षनिर्भरा, आनंदमया क्षणीं धरा झाली.

मंगल, मंगल उषा उदेली रजतरसें न्हाली
अमृतसिंचन करी धरेवर ती प्रातःकालीं.

फुलाफुलांतुन अणूअणूंतुन चैतन्य स्फुरलें,
चंडोलादिक पक्षिगणांचें गान सुरू झालें.

प्रभात वायू सुगंधमिश्रित हळु झुलवीत लता,
मलयगिरी मंदानिलसम ती सुखकर शीतलता.

वनीं उपवनीं वेलिवल्लरी दिसती फुललेल्या,
जाइ-जुई, मोगरी लता तर वांकुनिया गेल्या.

पुष्पपल्लवान्विता जाहल्या साऱ्या तरुवेली,
डोलत होतीं आनंदानें शेतें पिकलेली.

भूबालेच्या वदनावरती सोन्याहुन पिवळी
प्रभा फांकली जिकडे तिकडे मणि मोत्यें उधळी.

आनंदानें उत्साहानें नटलें जग सारें,
जिकडे तिकडे आणि संचरे प्रीतीचें वारें.

पतिपत्नी वा बंधुभगिनी बालबालिका तीं
आनंदानें विहरत होतीं प्रीतीच्या जगतीं.

आज दिवाळी जिकडे तिकडे थाटमाट चाले
जनमन अवघें आनंदानें न्हाऊनिया गेलें.

वस्तुवस्तुवर सौंदर्याचा साज नवा चढला
आणि अंतरीं उत्साहाचा किरण नवा खुलला.

रंगवल्लिका, दीप, तोरणें, पुष्पांच्या माळा,
वस्त्राभरणालंकृत जन दे शोभा सदनाला.

नभास तारकगण कंटाळुन भूमीवर आला
कुठें त्यासवें खेळायाला बाळांचा मेळा ?

प्रीति, चारुता, कला समृद्धि प्रकर्ष दिपवाळी !
स्वर्गसाम्यता तत्सहवासें अवनीला आली.

सतत सुखाच्या सहवासाचा येतो कंटाळा
येउन जाउन म्हणुन येतसे ही वेळोवेळां.

अशीच वर्षोवर्षीं मंगल दिपवाळी यावी
आणि अंतरीं गोड तियेची हुरहुर लागावी.

# हंसणाऱ्या बालकास

हांस मधुर हांस, सतत हांस हांस बाळा!

हास्य न हें परि अमृत,
वदनेंदू सतत स्रवत,
देत जगा नवजीवित—
फुल्ल करित त्याला.

हास्यशशी उदित होत,
हृदयोदधि हेलावत,
नयनतीर गांठितात
अश्रुउर्मिमाला.

हास्यशशीकिरण शांत
दुःखध्वांत दूर करित,
हृद्‌कुमुदिनि हो विकसित,
खेद लया गेला.

वाटे क्षीरोदधींत
उर्मि उठुनि व्योमिं उडत,
जळतुषार फेनयुक्त
हास्य तुझें बाळा.

हास्यकुसुम जइं विकसें
अविमधुप मोहवशें
मधुपाना करित बसे,
भान हरुनि गेला.

अरसिकासि पुष्प, काव्य,
तारकतति काय होय ?
परि हास्यें हर्ष होय
अखिल या जगाला.

राव रंक, हीन दीन,
शूर भीरु, अज्ञ सुज्ञ,
हास्यसुधा मधुरपान
करुनि तृप्त झाला.

हंससि जगा हंसवीसी,
वृत्ति सर्व खुलवीसी,
मोहनि तव वदनिं अशी
मोहवी मनाला.

जातां तूं नंदनवनिं
चुकुन येशि या भुवनीं
मार्ग मिळत ना म्हणुनी
पुससि का कुणाला ?

हास्यसुधाकुंभ भरुनि
बालरूप मधुर धरुनि
देवदूत स्वर्गांतुनि
जगतिं काय आला !

हास्य न हें ईशाशीं
संभाषण तूं करिसी
पुण्यरूप ! धन्य ! तुजसि
प्रभु न धरि अबोला.

# सहज सुखें हांसायाची हीच खरी वेळा

हांस, हांस, हांस अमा, हांस बघूं बाळा
सहज सुखें हांसायाची हीच खरी वेळा.
तव जीवनकुसुमकळी
हुताशें नच सुकली
कीटकें न पोंखरिली
तोंच विकस, कोमळा !

ना अजुनी भेद भाव
ठाउक ना रंकराव
सुरभिकुसुम मृदु स्वभाव
अजुन तुझा बाळा !

नच जडसंस्कृतिबंधनिं
गुंतलासि बा ! अजुनी
हंसण्याचा घे म्हणुनी
तोंवरीच चाळा.

हालाहल अरि अंतरिं
हास्यवदन दावुं वरी,
अवगत नच या जोंवरि
कुटिल कुशल लीला.

घालतील मर्मि घाव,
वंचिल तुज प्रेमभाव,
हंसण्यातें कुठुनि वाव
तुजसि तदा वेळा ?

# छत्री

बाळ माझा शाळेस असे गेला
यावयाची जाहली असे वेळा

आणि मोठा पाऊस सुरू झाला
'कुणासंगें येईल तो घराला—'

मनीं मातेच्या प्रश्न उभा झाला
खिन्न होउनिया बाळ तोंच आला,

नेत्रिं अश्रूंचा ओघ चाललेला
स्फुंदस्फुंदुनिया बोलतसे बोला-

'सुटुनि शाळा आई न वेळ झाला
तोंच धोधो पाऊस वरुन आला

नवी छत्री हातांत धरुन छान
प्रभा, शेजारिल चालला पुढून

झणीं गेलों छत्रींत शिरायाला
तोंच अंगावर ओरडून आला—

'कोण घेतो छत्रींत भिकाऱ्याला
भिजत जाई तूं आपुल्या घराला—'

कधीं छत्री देशील मला छान
गर्व त्याचा गे सर्व मी हरीन'

हृदय होतें आधींच पोळलेलें
शब्द ऐकता करपून पूर्ण गेलें

# प्रथम दर्शन

प्रथम दर्शनीं      प्रीति जडे वेड तुझें लागलें मनीं.
जादु लोचनीं      मंत्रमुग्ध विश्व अखिल जाहृ होऊनी
मधुर हासिनी !      चंद्रिकाहि मंद गमे मजसि तुजहुनी !
मंजुभाषिणी !      माधुर्यें कोकिळाहि जाइ लाजुनी !
चारुगामिनी !      लज्जित हो हंसतती आपुल्या मनीं !
स्वरूपगुणखनी      तोलुं कुठें ? स्वर्ग धरा तुजहुनी उणी !
सुगुणशालिनी      वर्णु किती ? कुंठित हो मदिय लेखणी.
देवता कुणी ?      मानवता स्वद्रूपें घेइ जन्मुनी ?

# चुंबनसंगीत

हं चल देई, कशास इतुकी चुंबनास लाज?
चुंबन–संगीतांत दंगलें अवघें जग आज.

हळूच येउन अरुण वठवितो अरुणरंग गालीं
उषा लाजरी हांसत हांसत त्यास मिठी घाली.

दिन रजनीचें चुंबन घेतां रजनीही हंसली
विनयवती ती लाजुन झडकरि अंतर्गृहिं गेली.

चुंबित वसलें फूलपांखरूं फुलती फुलवंती,
भृंग दंग हो मृणालिनीसह लुटीत रसवंती;

गगनश्रीच्या अधरावरती ठेवुन निज अधर
प्रणयसमाधी लावुनि बसला येथें धरणिधर.

चुंबित, चुंबित निर्झर धांवे हळव्या हिरवळिला
स्पर्श सुखाचा सुखास होतां पुलकित हो बाला.

गळ्यांत घालुन गळे आपुले वृक्षासह वेली
करिती प्रेमें कलिकाओष्ठीं चुंबनमय केली.

चंद्रचुंबनीं ऊर्मी हृदयीं भरती प्रेमाची;
चंद्रिकाच कीं प्रभा फांकली त्यांच्या हास्याची.

अल्लड सरिता, गंभीर सागर, मीलन प्रेमाचें;
चुंबन होतां परस्परांचें हास्य मुखीं नाचें.

स्वर्ग धरेला धरी कवळुनी दृढ निज हृदयाशीं
मीलन त्यांच्या बघ अधरांचें त्या क्षितिज्यापाशीं.

फेर धरुनिया गगनीं नाचे हा तारकभार
परी परस्पर चुंबन हाची तयांसि आधार.

चराचराचें असें चाललें चुंबनसंगीत,
चल दे चुंबन, सूर आपुला मिळवूं ये त्यांत.

सौंदर्याची, माधुर्याची, प्रेमाची आशा;
अस्पष्टाच्या स्पष्टपणाची चुंबन ही भाषा.

प्रीतिदेवतेच्या चरणांची चुंबन चाहूल;
प्रेमलतेच्या नव बहराचें चुंबन हें फूल.

चुंबनास मग कशास चोरी ? हा उघडा खेळ,
हृन्मीलन गे कैसें दाबुन दबलें जाईल ?

हृदया हृदयांशीं भिडवोनी, बाहू बाहूंत,
उरलीं अवसानें देहाचीं अवघीं नयनांत.

अधरा जडला अधर, मिळाला श्वासहि श्वासांत,
व्हावा चुंबनगीता गातां उभयांचा अंत.

# तूंच होइ राजा माझा

तूंच होइ राजा माझा जीविच्या जिवाचा
अन्य तुझ्यावांचुन कैसा प्राण अगायाचा ?

सौख्यगिरी शिखरावरती मीच सोबतीण
ठेवुनिया स्कंधीं तुझिया मान मी फिरेन
आणि गोड गानें सख्या तुजसि रंजवीन
करिन तुझा द्विगुणित राया मोद मीच साचा.

आणि खोल गिरिकुहरीं रे दुःखदरींमाजीं
सदा तुझ्या संगें येण्या मीच असे राजी
करिन दुःखभारा हलकें पडुन तुझ्या काजीं
चोखळून आधीं पुढचा मार्ग कंटकांचा.

पायिं तुझ्या रुततां कांटा येइ नीर डोळां
दुःख तुला सजणा होतां जीव होति गोळा,
जडत तुझ्या ठायीं माझा भाव असा भोळा,
तृषित प्रेमनीरासाठीं जीव चातकाचा

व्यथितहृदय राया मी, तूं एक सदाधार
विकलचित्त विश्रांतीतें तूंच सुधाधार
केंवि करिसि विन्मुख मजला असति तूं उदार
तरी काय होइल या अखेर याचनेचा ?

जीवनौघ वाहत आतां तुजसवेंच नाथा
धन्य गणिन जीवाळागीं अंत तया येतां,
शांतपणें ठेवुन तुझिया वक्षस्थळिं माथा
अन्य दुजा नाहीं कोठें स्वर्ग तोच माझा !

# मधुर वंचन

चतुर विनोदी नाथ कौतुकें करी विनोदाला,
साधी भोळी फसली त्याला नवमुग्धाबाला.

काजळकाळुनी दुरुनी पाही जीवींचा जीव
अस्फुट हास्यें वदन विकसतें फुलतें राजीव.

बोले न निरखी जरी ओळखी हृदयींचा भाव
म्हणे मनाशीं, आज खेळतो हजसि कपटडाव

'किती खुणविलें, किती सुचविलें तरि बघणें नाहीं,
कळे न कांहीं आज येत कां राग असा बाई!'

चित्र पाहतां हातामधलें दंग त्यांत झाला
'अहा! काय सौंदर्य' वदे 'हें सुखवी नयनांला'

सर्वस्वाचें सर्वस्वहि मी अर्पियलें यातें
ओवाळुन या वरून टाकिन साऱ्या विश्वातें.

शब्द पतीचे पडतां कानीं रमणीवदनीचें
हास्य पळालें, कोपें चाले कंडण अधरांचें

मुग्धा मनाची भोळी सरली, हृदय तप्त झालें,
नयनांचा नाचही थांबला, उष्ण श्वास चाले,

स्त्रीजातीची तदा असूया अंतरांत भिनली
भेदक, दाहक शब्दें त्याचीं काळजास भिडलीं

झटप चालली चित्रावरती विसरुन चिमबाला
“ कोण अवदसा भुरळ पाडिते पाहूं या मजला ”

उगाच दचकुन दडवायाचा चित्र हावि भाव
परी पडावें दृष्टीस तिच्या हा मनिंचा भाव.

बघतां प्रतिमा आपुलीच ती मनीं लजीत झाली,
वदन वांकलें त्यावर आली लज्जेची लाली.

करीं कवळुनी कांत विचारी आहे कां शंका ?
“ कोण कुणाला भुरळ पाडिलें आतां कळलें का ?”

“ फसवावें का उगाच लोकां कपटाव करुनी
कुणास ठावें काय मिळविलें या असल्या कृतिनीं ? ”

“ काय मिळविलें ? सांगूं का तुज कर इकडे कान
हें बघ, हें बघ, ” असें मिळविलें सुधामधुर पान.

चपळाईनें दूर पळाली बाहू सोडवुन
वदली नाथा ‘ कधींतरी हें उसने फेडीन ’

# उत्कंठिता

योजियलें किति सुरम्य माझ्या मनोराज्य मी मनीं
राय कधिं बसेल सिंहासनीं ?

मनो–कल्पना सौख्य–संभवें अश्रु उभे कोचनीं
हंस कधिं प्राशिल तो चंचुनीं ?

मूकगान हृदयांतिल माझ्या उमटे ओठावरी,
रसिक तो गाइल तें कधिं परी ?

हृद्वीणेची तार लाविली कोमल पंचम स्वरीं
कधीं तो गायक तरलित करी ?

हृदयांबुज विकसलें वाहतो मरंद ओथंबुनी
भृंग कधिं येइल तो गुंजनीं !

हांक मारिते सदा भाळवुन जीवभाव मी जया
कधिं तया येइल माझी दया ?

जीवन विरहित मीनासम जी तळमळ मम अंतरीं,
शांत ती होइल का कधिं तरी ?

# निर्दयबालेस

अवगणिलें मी जगास केवळ तुजकरितां बाळे,
अवगणुनी मज अखेर माझें हंसेच त्वां केलें!
आयुष्याच्या सुखशिखरावरि कळस तुझ्या हातीं–
ठेवायाची इच्छा भारी मनांत या होती.
रम्य रेखिलीं जीवनचित्रें इन्द्र-रसरंगांत.
अदयपणें परि वरी फांसला त्वां काळा हात.
अत्युत्कट मम प्रेम तुजवरी ठाउक हें तुजला
कळे न कारण का एकाकीं घात असा केला!
प्रेमसंभवें उसळुनि आल्या हृदयाचीं गाणीं–
तुला गाइलीं, तींच आणिती आज नीर नयनीं.
होशिल माझी– वेडी आशा जखडुनि जीवाला-
बसली, ओढुनि काढूं आतां कंठिं प्राण आला!
किती चाळले हाल जिवाचे कल्पना न तुजला,
प्रणाम प्रेमा आतां येथुन कायमचा केला.
हृदयवल्लभे! आशेवरि तव तुच्छ विश्व गणिलें,
कटु फल त्याचें दुर्दैवें परि मम भाळीं आलें.
पाच मानुनी वस्तु उचलली ती ठरली काच,
अमृत झालें जहर, हाय अति दुष्ट दैव साच!
स्वप्नींही वाटलें न होइल अखेर तें झालें,
अंधाराचें भयाण जीवन नशिबाला आलें.
जरी अनंतोदरीं निमालें गीत कर्णमधुर,
स्मृतिफलकावरि तरी विहरती तेच दिव्य सुर.
या जन्मीं नच काम तुझा मज हृदयाच्या देवी!
त्वन्मूर्ती परि विलसत राहिल अखंड मम हृदयीं.

# अश्रुसमर्पण

अशी पाहुनी तुला बालिके येतें हृदय भरून !
बाळपणाचा काळ सरकला झटकन् नयनांपुढून !

तृप्ति न झाली जरी पाहिलें अनिमिष डोळे भरून
तीव्र दृष्टि हो स्तिमित आज परि अंधारी येऊन !

हंसरें मुख तव सदा सुकावें फुलल्या चांफ्याहून
कारुण्याची दारुण छाया टाकी त्या करपून !

बाळपणाची अल्लडता तव गेली काय पळून ?
गभीरता ही भीषण, वदनीं आली वद कोठून !

सौभाग्याचा सूर्य तुझा गे गेला कधिं लोपून ?
शेषजीवनीं काय राहिलें तुज दु:खावांचून !

कंठित होतों कठोर जीवन कसाहि कोठें खपून
गतकालांतिल सुखक्षणांची स्मृति हृदयांत जपून !

मानित होतों समाधान मनिं सुखांत असशिल म्हणून
दृश्य करुण तव आज टाकितें हृदय दुभंग करून.

दु:खावेगें सरसर झरती अश्रू नयनांतून
अर्पाया तुज काय राहिलें आतां त्यांवाचून !

# चिरसंमीलन

तूं होतीस सखे यदा जवळि तों झाली युगें कीं क्षणें
तूं होता क्षण एक दूर क्षण तो भासे युगाच्या परी
लीलालाघव हास्यही मधुर तें दृष्टी तुझी काजरी
आणूं आणि कितीक चित्तिं सखये तीं गोड संभाषणें
ज्यांच्या सेवनिं स्वर्ग सौख्यहि गडे मी मानिलें कीं उणें
तीं सारीं सुखदा तदा, परि अतां टोंचीत शल्यापरी
आतां राहसि दूर तूं विरह हा साहू किती अंतरीं
स्नेहाबांचुन प्रेमळे तव गडे कंठूं कसें हें जिणें
आतां भेटसि वा न भेटसि त्वरें वाटे न कांहीं मुळीं
अंतःचक्षु मदीय खोलुनि अहै मी पाहतों गे तुला
हीं बाह्यस्वरुपें जरी दिसति गे अन्याप्रती आगळीं
नाहीं अंतरिं भिन्नता विरह तो कोठून संभावला
होतो दूर परंतु ऐक्य अढळें ही जोडली सांखळी
आतां होवुं न दूर क्रूर जरि तो कल्पांतही पातला

# अंतरींचीहांक

काय नाहिं ऐकूं आली हांक अंतरींची ?
म्हणुन नाहिं केली आले कींव या जनाची

दर्शनींच पहिल्या दृष्टी पार दिपुन गेली,
हृदय कंप पावूं लागे, वाणि मूक झाली,
बधिरताहि गात्रांलागीं क्षणार्धांत आली,
स्तिमित, चकित होउनि राहे स्तब्ध मी तसाची.

शब्दसंपदाही संपे रूपसंपदेला–
अहे तुझ्या वर्णायाचा यत्न विफल केला
गर्व सर्व चातुर्याचा पूर्ण हरुनि गेला,
आणि वृत्ति माझी बनली मूक कीं सदाची.

दर्शनींच हृदयीं आले शब्द फुलुनि आले,
नाम तुझें उच्चाराया यत्न किती केले,
शब्द कंठिं आले परि ते ओठिं अडुनि ठेले,
लाख शब्द सुचवी माझी मूकता तदाची.

स्नेहपूर्ण नयनांनीं मी तुला न्याहळीलें,
लोल लोल नयनें तूंही केविं देखियेलें,
आणि गोड गोड किती गे हास्य तुवां केलें !
भाव किती पुष्पित झाले हृदयिं तयानेंची !

जीवभाव सारे माझे नयनिं जमा झाले,
हृदय हांक मारी तुजला कळवळून बाले !
व्यथित हृदय कैसें बाले अधिक सुकें बोलें,
नयनजलें विफल केलें विनवुनी तुवांची.

# आळवणी

पुरे ही वंचना आतां पुरा कंटाळला जीव
किती मी काळ कंठावा तुला ये ना कशी कींव?

दया माया न का राही तुझ्या अत्यल्प हृदयांत?
म्हणोनी पाहसी माझा मजेनें तूं असा अंत!

किती मी आणखी बाळे! तुझ्या शब्दीं धरूं धीर?
अधीरा जाहला जीव नसे आशेस का पार?

पुरे गऽ वायदे, आला अतां कंठामधें प्राण;
गडे! भेटीविना आतां झुरे तोही तुझी आण

बसे हृदयांतरांमाजी दिलेला शब्द आठवोनी
तुझा घे तूंच काढोनी तयाला पार फाडोनी

विनंती ही परी माझी तुला जोडोनिया हात
वळूं देऊं नको मूर्ती असे जी रेखिली ह्यांत

# वंचकास

प्रेमाचे मृदुल बंध सोडणें जरी
सोड सुखें परि इतुकी घाइ ना बरी.

तोडुं नको अदयपणें ओढुं फरफरा
विकल होत अंतर मम जीव घाबरा.

प्रेमाचा मोहपाश घातला मशीं
कहर तुम्ही फिरुनि अतां पाडिलें फशीं.

अन्य असे गुंतविणें त्यांत तुज गळा
तरि अदया करि मदीय प्रथम मोकळा.

गुंतविता नाजुकता केविं दाविली ?
मधुवचनें बोलुनि मज भुरळ पाडिली.

आर्पियलें विश्वसुनी जीविता तुला
आज परी अदया तूं डाव साधिला.

कोमल मम हृदय किती ठावुकें तुला
पुष्पाचा भारहि ज्या नाहिं साहिला

पायघड्या त्याच्या मी घातल्या तुला
अदयपणें केंवी त्या तूंच तुडविल्या !

वंचन मम हृदयातें सहन होइना
कोठवरी वद सोसूं कठीण यातना ?

विनति हीच अंतींची तुजसि मी करीं
एकदांच मम हृदयीं खुपस रे सुरी.

# निराश जीवन

ज्या तारेवर नजर खिळविली
गळली निखळुनि निमिषांत
सुखद काय उल्कापात ?

तार तडकता हृद्वीणेची
सुरेल विणा काय करी ?
भयाण भीषणताच बरी.

डुलता झुलता बाग मनोहर
फुलल्या पुष्पें सुखे जरी,
स्मशानसमची शून्य तरी.

मंद समीरणिं, कीं शशिकिरणीं
शीतलता लाभे कैंची
चिता भडकतां हृदयाची ?

सौख्याचा संसार संपला
शांतीची संगती सरे,
सोबत दुःखाचीच उरे.

मृत आशेचें भूत भयंकर
भटकत भकास हृदयांत,
तीव्र निराशा तिमिरांत.

ज्या आशेवर जीव तगवुनी
जगला आत्मा आजवरी
आस भंगली तीच जरी—

शेष जीवनीं काळ कंठणें
उगाच जीवित त्या म्हणणें,
मरणाहूनिही तें मरणें !

# पैल तीरावर

मंद वाहता जलौघ त्याचा तरंग परि नाचरा
झुलवित होता इकडुनि तिकडे नाव मजेनें जरा,

पैल थडीवर दिसे नदीच्या कोण उभी सुंदरा
जरा थबकली, वळुन जराशी नजर टाकली जरा,

नजर कशाची तीर भेदुनी गेला हृदया पुरा
तिथेंच खिळली नजर सारखी होत जीव बावरा

पछ्याड दिसती कळस राईतुन तडक चालली घरा,
नागमोडि ती वाट दुतर्फा तरुवर आले भरा;

सुवर्ण कांती वरी, खालती पाचूचा आसरा
मार्ग हिरण्मय निळा आक्रमी दिव्य जणूं अप्सरा;

गेली डोळ्याआड, वीज कीं स्पर्शुनिया अंबरा,
सुखावले मम नेत्र लागला चटका परि अंतरा.

---

एका इंग्रजी कवितेच्या आधारें.

# मोळीवाली

रंग सांवळा असे तियेचा नव्हती ती चांदणी
टपोर डोळे, सतेज कांती रेखिव परि बांधणी.

मोळी गवताची डोईवर, कमरेला कोयता
उन्नत वक्षस्थला आवरी कटीं पदर खोवता.

माळ उतरता हिरवी हिरवळ गवताची त्यावरी,
पाउलवाटहि वरी उमटली, पळत्या नागापरी,

गर्द वनश्री पार्श्वभागिंची चुंबितसे अंबरा,
अगणित पक्षीगणरव सुस्वर साथ करी निर्झरा,

नील नभाचा वरी चांदवा संध्या किरणीं खुले
हरित गालिचा खालीं त्यावर सुंदर गवती फुलें

एक हात मोळीला, दुसरा हेलकावता जरा,
प्रमुदित मुद्रा जरा घाबरी, झरझर चाले घरा.

कुणास ठावुक कुणी लाविली ओढ तिच्या अंतरा
भाग्यश्री सुभगाची कोण्या, धन्य धन्य तो खरा !

# स्मृति

आवाज आहके शांत
संगीत घुमत स्मरणांत.

जरि सुमनें सुकुनि जाती
सौगंध उरे चित्तांत.

ते गुलाब फुलते हंसती
जरि विशीर्ण होउनि जाती

मृदु, कोमल पुष्पदळें तीं
प्रणयिनिच्या शय्येसाठीं.

तव चिंतन मजला तैसें
जाशील यदा सोडून

अन् प्रीतिभावनेमाजीं
टाकील मला गुंगून.

---

एका इंग्रजी कवितेचा अनुवाद.

# आतां कशाला ?

आतां कशाला
    जळ सिंचनाला ?
        अंकुर सगळा
            सुकुनीच गेला !

आतां कशाला
    मधु भाषणाला ?
        केव्हांच पडला
            व्रण अंतराला !

आतां कशाला
    फळ तोय त्याला ?
        पक्षी भुकेला
            निष्प्राण झाला !

आतां कशाला
    हिमलेपनाला ?
        प्राशोनि प्याला
            विषदग्ध झाला !

आतां कशाला
    वृष्टी अवेळा ?
        कवळाच सगळा
            मळा जळाला !

आतां कशाला
    जळ लोचनांला ?
        हृद्भाव पहिला
            आतां निमाला !

# प्रेमविस्मरण

'प्रेमा विसरा, विसरा मजला, विसरा सगळें कांहीं'
वदलिस बाले, वद परि पटलें का तें हृदयालाही?

पटलें तर मग कशास बाले! अशी अडखळे वाणी?
पटलें तर मग कशास वाहे घळ घळ नयनीं पाणी?

'प्रेम' शब्दही ठावुक नव्हता आपणांस ज्या काळीं,
शब्दाआधीं तींच भावना हृदयीं जन्मा आली.

अभ्यासाचे पाठ तुला मी दिधले गे पढण्याला,
कुणी पढविले परी संवगडे प्रेमपाठ उभयाला!

जरा विसरतां तुवांच केला आठव वेळोवेळीं,
पुरता होता तोंडपाठ मग तोंड-मिळवणी केली.

पाटीवरचा पाठ कसाही सहज पुसोनी जाई,
हृद्-शीलेवर रेखियला तो केविं पुसाया येई?

केविं गाइलीं सुरम्य कवनें सुरांत मिळवुनि सूर?
नाद निमाला तरी तयाची स्मृति नच होई दूर.

गळां घालुनी गळा देखिलें केविं दर्पणामाजीं?
प्रतिबिंबित तें चित्र हलेना नयनापुढुनी आजी.

विसरा म्हणुनी काय प्रेमले येतें विसरायाला!
विस्मरणाचें स्मरण हरघडी असखी गे जीवाला.

काय काय वद मी विसरावें काय स्मरावें बाले!
तुला विसरणें, स्वतः विसरणें असेंच आतां झालें!

# प्रतारणा

जगाचीहि नाहीं ऐकिली फिर्याद
 जिच्या पायिं दाद मागावया

चिंतनांत जीच्या दिन आणि राती
 पाजळिल्या ज्योती जीवाचिया

जीवाचें मी केलें माझिया वैराण
 सुखाचें निधान लाभावया;

भेटतांच दृष्टी भेदिलें अंतर
 परि आतां दूर लोटीतसे;

हळुवार गुंफी हृदयाचे बंध
 धरी आतां छंद तोडण्याचा;

भावजीवनानें जीववी अंकूर
 येतांच मोहोर खुडीयेला;

जिवें भावें केलें प्रेम जीच्यावर
 अंतीं ती निष्ठूर जाहलीसे.

प्रतारणा घोर करूनी दारूण
 हृदया भंगून टाकियेलें.

# क्षण सहवास

विश्रांतीस्तव पहुडत होता अंबरीश अंबरीं
	पसरली बिछाईत भर्जरी;
सोनेरी झालरी ढगांच्या हालत सुंदर वरी
	विंझणा मंद समीरण करी;
निथळत होतें तेज नभांतुन तरु तरु शिखरांवरी
	मुलामा सुवर्ण पाचूवरी,
बसली होती हरित द्रुमाच्या फुलल्या फांदीवरी
	पांखरें दोनच चेतोहरी;
पंख पांखुचे, नयनिं माणकें, चोंच पोवळ्यापरी
	गुलाबी रेशिम छातीवरी.
विरहव्याकुल वाटत होतीं कधिकाळीं भेटलीं
	लोचनीं आतुरता दाटली;
गोड, गोड ते बोल तयांचे किलबिल जी चालली
	जणों त्या स्वर्गसुखें लाधलीं.
चंचुपुटीं घालुनि चंचुपट चुंबियेलें कितितरी
	न झाली तृप्ती त्यांची परी,
हृदयालागीं हृदय भिडवुनी गळ्यांत घालुन गळा
	हृदयींचा भाव करिति मोकळा;
टपटपली टपटपा टिपें तीं दोनच भूमीवरी
	भुर्र मग दोन दिशेला दुरी;
कवि मानस हो विषण्ण आणिक विचार ये अंतरीं
	फिरुन का भेटतील कधितरी ?

# पुष्पसमर्पण

अर्धोन्मीलित हृद्कळी विकसली जेव्हां तुझी सुंदर
तीचा सौरभ सेवुनी मम सये ! लोभावलें अंतर,

कीं लाभेल मला मरंद म्हणुनी आशेंत रात्रंदिनीं
रुंजी घालुनि भोंवतीच भ्रमलों मी भृंगसा गुंजनीं.

तेव्हां आतुरता तुला न कळली जी माझिया अंतरीं
नाहीं बोल तुला, न स्निग्ध मन जों कैशी कळावी तरी !

गेलों विन्मुख होउनीच पुरता मी तेधवा गे दुरी
होतों कंठित काळ भग्न हृदयीं कैसाहि कोठें तरी.

तूं आलीस फिरुन येथ सदये ओलावल्या लोचनीं
होतां जागृत भावना हलवुनी पूर्वस्मृति तन्मनीं

माझा मीच नसे जरी तुज दिसे तैसाच बाह्यांतरीं
पाहे प्रीतिसमाध गे उभविली आहे मदभ्यंतरीं.

आतां व्यर्थ कशास अर्पिसी बरें ह्या मोगऱ्याच्या कळ्या ?
जा टाकून विकीर्ण येथ करुनि त्यांच्याच गे पाकळ्या !

# पुण्य-स्मरण

सरस्वतीचा कंठमणी तूं वागीश्वर तूं प्रतिभेचा
मानकरीही तूंच शाहिरा, नव कविता-जरिपटक्याचा,

रंगभूमिचा कुशल चितारी नांव जगीं त्वां गाजविलें,
जादुमंत्र योजून मनोमन जनमानस वेडें केलें.

कवना कवना मधून निघती नितांत मंजुळ मधु सूर
आणि वाहती दिव्य कल्पना तेजांकित प्रतिभा पूर.

जनहृदयाची तार छेडुनि मृदुल भाव जागृत केले
हृदयविदारी सूर काढुनी दास रूढिचे हलवीले.

प्रेमरसाचें सिंचन करूनी कणकण देहीं फुलवीला
करुणागानीं अखंड झरणी लावियली जनहृदयाला.

शब्दाशब्दामधुन उसळल्या हास्यरसीं विरला जीव
खुलल्या वृत्ती ठायिंच जिरले विषण्ण हृदयांतिल भाव

काव्यकला तव धन्य धन्य तूं महाराष्ट्रजन विश्रामा !
पुण्यस्मरणीं प्रणाम चरणीं विनम्र भावें कवि रामा !

# तुझीं पत्रें

वेळोवेळ तुवां दुरून मजला जीं प्रेमला धाडिलीं
पत्रें तीं अजुनी तुझीं सहृदया आहेत मी जोपिलीं,
चित्रें सुंदर दाविती हृदयिं ज्या हेलावल्या भावना
गेलेला निजकाळ तीं उभविती दृष्टीपुढें रे पुन्हा.
सौख्याच्या शिखरीं विराजित यदा दुःखांत वा पोळतां
केली मत्स्मृति रे तुवां समयिं त्या स्वचित हेलावतां
साधे शब्द रसाळ स्नेह भरले ओथंबले प्रीतिनें
त्यांच्या सेवनिं आर्द्र अंतर बने ओलावती लोचनें,
भक्ति, प्रीति, हितोपदेश सगळीं त्यामाजी रे सांठलीं
शास्त्रेंकाव्य विनोद उत्तम कीं तेथेंच सामावलीं
जेव्हां ये विमनस्कता हृदयिं या ना चित्त कोठें जडे
तेव्हां वाचित एकटाच बसतों, धिग् सर्व त्यांच्यापुढें

---

( माझे जिवलग मित्र रा. रा. दत्तात्रय विनायक सबनीस,
यांचींच हीं पत्रें होत. )

# जंजिरा

अफाट दर्या खालीं, वरती अफाट अस्मान
शूर छातिचा कोण उभा हा मधें बेगुमान ?

असंख्यताराहीरकमंडित शिरिं चढवुन साज,
शुभ्र रुपेरी चिलखत ज्याला बांका बरकंदाज.

स्कंधीं बंदुक, कट्यार कमरीं, हातीं समशेर
कोट छातिचा करुन उभा हा धीट शिलेदार,

सागर-लहरी-वारूवरती, होउनिया स्वार
आत्मरक्षणीं भेदी दृष्टी फिरवी चौफेर.

कीलेनें टाकितां नजर ती रायगडा पोचे,
बघतां तुकडे थरथर करिती पश्चिमचे चांचे,

दख्खन दौलत अमोल त्यांतिल अमोल हाच हिरा,
दख्खन हमला वैभवशाली त्याचा हाच चिरा!

ज्याच्या लाभासाठीं वळल्या लोभी किति नजरा
न जरा परि हा परास अंकित, अजिंक्य हाच खरा.

मान मरातब ऐहिक कीर्ती यांचें हा स्थान,
लढतां लढतां स्वर्गी चढण्या कीं हा सोपान!

खांद्याशीं निज खांदा भिडवुन जे लढले त्यांची
याहूबंदगी, खरी खरोखर ना तरि नांवाची!

सुळींच चढवा, ग्या फांसावर, द्या तोफे तोंडीं
हाडें बदलिल राजनिष्ठता देह जरी सांडी.

हिंदु अहिंदु, जातिभेद वा नव्हता त्या पोटीं
कढले घेउन शिर हातावर ते स्वामीसाठीं.

कधीं न केली कदर जीवाची तुझ्या रक्षणासाठीं
संकट समयीं अम्हा रक्षिलें त्वां धरुनी पोटीं

"प्रधान" होतो "सबनिस" झालों परी तुझ्यासाठीं
साभिमान तें नांव मिरवितों पृथ्वीच्या पाठीं.

कुर्निसात ही नृपतीसह तुज आणि पांचपीरां
प्राणाहुनही हा जंजीरा आम्हांका प्यारा.

# स्फुल्लिंग न गेला तव विझुनी

स्फुल्लिंग न गेला तव विझुनी
नच स्वयंतेज आई विरुनी !

चैतन्याचे निधीच आपण
देत दर्शनें अन्या जीवन
नवजीवन त्या जिववी कोठुन ?

होईल परिस का लोहगुणी ?

अखंड तेजाची जी खाणी
अढळ पदीं जी वसे जाउनी
तारा, तिजला स्खलन कोठुनी ?

जग जाय जरी प्रलयीं बुडुनी.

क्षणभर हंसतें फूल लतेवर
रूप तयाचें भुलवी स्थिरचर
आणि सौरभें हो अजरामर

नवजीवन फुलविल त्या फिरुनी.

सुधाकुंभ हा वदसि भंगला,
बहार झाली पूर कोटला,
दगड मृत्तिका कणकण फुलला,

तव काव्य पाझरे त्यामधुनी.

विजय संपदा तुझी चमकती,
परिक्षिक हातीं, जरि तूं माती,
मानितील ती माणिक मोतीं

तें 'निशाण' फडके बघ अजुनी !

आशा अजुनी बेडी नाहीं
पूर्वस्मृति देवताच बाही
अतृप्त तृषा धाली नाहीं
तव काव्यसुधा चषकां पिउनी.

ओहट भरती कीं उदधीला
क्षयवृद्धी संतत चंद्राला
उदयास्तांतून रवी न सुटला
कां खिन्न होसि मग तूंच मनीं ?

दिपवाळीचे उत्सव जगतीं
काजवेच बहु चमचम करिती
फसवि न रसिकां त्यांची दीप्ति
शोधीत दिव्य ज्योती म्हणुनी.

दिव्य स्फूर्ति प्रतिभा अभिनव
क्षणांत उभविल विश्व नवोनव
कोठुन त्यासी येत पराभव
आहला अमर निजगीतांनीं ?

---

प्रसिद्ध कवि श्री. स. गो. विरकुड यांच्या "स्फुलिंग पार गेला विझुनी" या आत्मपर कवितेस ही कविता उत्तर म्हणून आहे.

# वेडा कोण ?

जगाच हंसतों वेड्याला
कारण नसुनी आम्हांला
तो वेडा वा आम्हि खुळे ?
हाच प्रश्न कोणा न कळे
मजला भासे
कीं भरलेंसे
जग वेड्यांचें
वेड लागलें सर्वांना
सुबुद्ध वेडा कुणा गणा ?
लावी ललना वेड कुणा,
कांचन तेंवी कांहिं जनां,
द्यूत, पान व्यसनें वेडे
किती बनले ! बनतील पुढें.
सुस्वन श्रवणें,
गान वाद्नें,
नृत्य नर्तनें,
वेडे केलें किती जनां !
सुबुद्ध वेडा कुणा गणा ?
दया धर्म नयनीतीचा
लेश नसुनि अंगीं साचा,
सत्य तत्व तें विसरोनी
मिथ्यानें मायें फिरुनी,
रणीं झगडती,
रक्त सांडिती,
खून पाडिती,

सुज्ञ म्हणूं का अशा जनां ?
सुबुद्ध वेडा कुणा गणा ?
प्रेमें रंगुनि होति पिसे,
प्रेमभंग हो म्हणुनि पिसे,
भार्या सुत धन संसारीं,
दंग कुणी, कुणि अधिकारी,
कीर्तिसाधनीं,
मूर्तीभजनीं,
मूर्तिभंजनीं,
वेड लागलें किती जनां
सुबुद्ध वेडा कुणा गणा ?
कुणा लागलें ग्रंथाचें,
कुणा लागलें पंथाचें,
फुलें, मुलें, ग्रहगोलांचें,
तेंवि कुणाच्या बोलाचें,
कल्पोक्तीचें,
कुणा मुक्तिचें,
कुणा भक्तिचें,
वेड लागलें सर्वांना
सुबुद्ध वेडा कुणा गणा ?
जग वेड्यांचा बाजार
देवघेव वेडेचार,
सुज्ञपणा वरचा शिक्का
बघून जन फसतात फुका,
वेडाविण परि
जगाभीतरीं
असे कोण तरि ?
जन वेडा वदतात जया
वेड कशाचेंही न तया.

# कशास ही हुरहुर?

कशास ही हुरहुर ? मानसा !
सदा बदलता नूर जगाचा
जिवापलिकडे जोपियलें जें प्रेमचि हो निष्ठुर !
दाटुनि आला कंठ तुझा का फाटुनि गेला ऊर !
दुःखावेगें काय लोटला नयनीं अश्रूपूर !
पुसुन टाक त्या गतस्मृती जरि हो हृदयाचा चूर !
कोण तुझ्यास्तव अडून बसलें जो तो सौख्यीं चूर !
सौख्यसमयिंचे शालुसोबती सोडुन जातिल दूर !
मानभावि संगती सोडुनी जावें विजनीं दूर !
बरवा वाटे सहवासचि का हिंस्र पशूंचा क्रूर !
अवहेलन तव हळव्या हृदयीं उठवि काय काहूर !
प्रीतिलता लाविली जियेनें तीच तोडि अंकूर !
भंग पावली हृद्वीणा मग कैंवि निघावा सूर !
तुटक्या तारा छेडित बसशी कशास त्या बेसूर !
जीवनसंगित असे विसंगत कां मग चिंतातूर !

# मार्ग आपुला काढीन मीच

मनीं धरीरे मनीषा हीच
मार्ग आपुला काढीन मीच.

नकोत उपदेशक हंगामी,
ठरिव ठशाचे शब्द निकामी,
प्रसंग पडतां येति न कामीं,
मजा बघती दुरुनीच.

गेले पुढतीं, जातिल पुढतीं,
मला न त्यांची वाटे खंती,
गांठिन निश्चित ठिकाण अंतीं,
निर्धार मनीं नक्कीच.

मळल्या मार्गावरुनी जाणे,
सांगाया का हवे शहाणे ?
जग सगळे का अम्हा न जाणें ?
गतानुगतिक अम्हीच.

ध्येयाचा निजतारक वरती,
उद्योगाचा दीपक हातीं,
शील हीच मम सारी शक्ती,
सोबत सत्याचीच.

असोत मार्गी खंदक कांटे,
आ पसरोनी उभीं संकटें,
धैर्य धरोनि हृदयीं मोठें,
तुडवुन जाइन तींच.

ध्येयाचें निज शिखर गांठितां,
साभिमान मग मागें बघतां,
नयन नाहतिल बघतां बघतां
आनंदाश्रूंनींच.

# ती एकच तव रे गोड कृती

ती एकच तव रे गोड कृती
हरवील दु:खमय लाख स्मृती.
हळहळलेल्या हृदयासाठीं
जीव जयाचा किंवा कष्टी
अनुकंपेचा शब्दच ओठीं
तुझ्या एक त्या मोल अती.
नैराश्यानें हताश झाला,
लावुनि बसला हात कपाळा,
उत्साहाचा शब्द तयाला
देइल कीं नवचित्शक्ति.
अफाट सेना सागर पुढती,
शूर वीर परि धडकी छाती,
स्फूर्तीचा वच एकच त्याप्रति
विजय संपदा आणील ती.
कंठित कष्टें खडतर जीवन-
अंधारांतिल भयाण भीषण,
मधु हास्याचा तव एक क्षण
फुलवि चंद्रिका तयाप्रती.
निर्धनतेचा निर्बळ सारा,
अपमानाचा तापद वारा,
अश्रूंची तव एकच धारा
रुजविल हिरवळ तच्चित्तीं.

# भावना आणि व्यवहार

किती त्यानें ते मित्र जोडलेले
जिवाभावाचे म्हणुनि बोलिलेले
        कवी, संपादक, सुविख्यात वक्ते,
        लोकसेवक आणीक कलाभोक्ते.

रुग्णशय्येवरि आज पडुनि राही
आस जीवाची त्यास मुळीं नाहीं,
        मनीं वाटे येतील मित्र सारे
        दुःखभारा हरतील वदुनि 'बा रे'

परी आशा ती होय विफल सारी
कुणा मित्राची फिरकली न स्वारी.
        मग्न जो तो आपुल्या कार्यभागीं
        कशी व्हावी मग भावनाच जागी ?

वेळ कोठुनि तो कविस यावयाला !
असे जाणें त्या काव्य-गायनाला.
        आणि संपादक वेळ कुठुन त्याला ?
        जाहिराती धुंडणें मासिकाला.

आणि वक्ता, व्याख्यानमालिका ती
मित्रकर्तव्यावरी चालु होती,
        कथा अपुरी राहिली लेखकाची
        आज होती त्या पूर्ण करायाची

कठिण मिळणें आधींच वेळ ज्याला
लोकसेवक तो कुठुन यावयाला ?
        बालपणिचा परि एक राहिलेला
        मित्र कळतां हें वृत्त त्वरें आला.

नयनिं अश्रू अन् कंठ सद्गदीत
भावनेचा व्यवहार हो प्रतीत.

# अनाथाचा वाली

माय वृद्धा ती एकली गृहाला
अन्य नव्हता आधार कुणी त्याला,

एकटाची तो बाळ अर्ध पोटीं
दिसारात्रीं करितसे हेलपाटी.

देह अन्नावाचून क्षीण झाला,
वस्त्र पुरतें कोठून झांकण्याला ?

कुठें मिळतां कष्टून चार आणे
घरीं नेई खायास तई दाणे.

शिरीं घेउन आपली रिती पाटी
फिरे मोकास्तव इथुन तिथें हाटीं,

झगट करुनी कधिं जाई कुणा पाठीं
म्हणे "येऊं घेऊन काय पाटी ?"

* * *

धनिक गाडी उधळीत कुणी येई
शर्यतीला जाण्यास त्यास घाई,

मद्य पिउनी आधींच धुंद झाला
कींव गरिबांची त्याजला कशाला ?

चाक लागे झणि बाळ पडे खालीं
आणि गाडी निमिषांत वरुनि गेली.

जीव आहे का कुठें गरीबाला ?
आणि असला तरि मोल काय त्याला ?

‘ वृथा येती हे मध्यें मरायाला
वेळ झाला आधींच शर्यतीला’

देऊनिया अपशब्द दोन चार
स्वैर गाडी उधळीत जाइ पार.

*　　　*　　　*

बाळ इकडे निश्चेष्ट पडुनि राहे
रुधिर अंगातुनि भळाभळा वाहे

कुणी आणुन घालिता मुखीं पाणी
नेत्र उघडी, बोलला दीन वाणी-

‘ हाय आई मम एकली गृहाला
कोण घालिल तिज घांस अतां ओला ?

अनाथांचा तूं असासि प्रभो वाली–’
वदुनि ऐसें किं ज्योत ती निमाली.

# एक दृश्य

दूर माझ्या गावास जावयाला
निघालों मी, पावलों उताराला,
वेळ होता गाडीस यावयाला
म्हणुन बसलों मी घेत विसाव्याला.

दृश्य नयनीं तों एक दिसुनि आलें
सहज मानस मम तयें वेधियेलें.
कुणी युवती गुणवती विनयशाली
दंग बाळासह खेळण्यांत झाली.

गाल गोंडस, मृदु कुरळ केश काळे,
नील कमलासम शोभतात डोळे,
सान गात्रें गोजिरीं डौलदार,
कनककांती विलसली रुचिर फार.

दूर धांवे पुनरपी जवळि येई,
कधीं पाठीशीं हळुच दडुन राही,
कधीं ओढी त्या केशकलापाला,
कधीं कंठातिल सुमन मालिकेला.

स्वैर अंकावर झेंप कधीं टाकी,
सान हातानीं नयन कधीं झांकी,
गळा घालुन कर हळुच घेई पापी,
एक, दुसरी, तिसरी, न होय तृप्ति.

दुरुन पाही कौतुक कुणी बाळा
दिसत नव्हता कुंकुमतिलक भाळा
दीन वदनीं पसरली करुण छाया,
भग्न झांकीत अणुं आम्र-कळी-काया.

नाळ-उच्छेदित म्लान कीं मृणाल
फूल लतिकेचें गळित कीं मलूल !
माय-बाळाचें चित्र तें बघून
वृत्ति रमली, विसरली देहभान.

छटा मोदाची पसरली क्षणांत,
क्षणीं झाली परी मग्न विचारांत.
क्षणिक सौख्याची भंगली समाधी
आणि वदनीं खिन्नता उभी ठेली.

शीळ गाडीची श्रवणिं तोंच आली
आणि घाई भोंवतीं सुरू झाली
एक मोटें कटि घेत बाळकाला,
दुजी कवें उचलीत बोजक्याला.

# मीहि 'मलते'

वयें इवलीशी इंदुमुखी बाळा
बोल बोले बोबडे, करी लीला,
स्वैर धावे दुडदुड घरींदारीं
केश कुरळे शिरिं उडत भिरीभिरी

दिव्य तेजाची चमक नयनिं न्यारी
मुखीं विलसे मांगल्य मनोहारी.
मधुर बाल्याचें हास्य मुखीं नाचे
रोमरोमीं चापल्य चेतनेचें

दुष्ट जगताची ओळखी न झाली
ईश गेहीची स्मृति न अजुन गेली.
दिव्य मोदाच्या विहरणें नभांत,
अंगीं भरणें स्वर्गीय सुख नितांत.

हृदय हृदयाचें जीव जिवाचा की
अशी होती मातेस बालिका ती.
हरिणशावक ती धेनुवत्स किंवा
फुले कलिका मधुमक्षिके सवें वा

*　　　*　　　*

रुग्णशय्येवरि माय पडुनि राही
क्षीण होई गुण औषधीस नाहीं
माय दुःखानें खिन्न मनीं होई
हाय ! मजला जाणार सोडुनी ही !

अभागी मी सहवास नसे दैवीं
नाथ! आपुला मत्स्मृती असो यावी;
असे बाला तिजवरी दृष्टि यावी,
शांत ठेवा मन, खंत ना करावी.

*    *    *

वक्र भ्रुकुटी, हनु करीं, कलति मान,
अचल लोचन, गांभिर्य मुखीं साम
तात जननी कां दिसत आज ऐसी
गुंग झाली हें गूढ उकलण्यासी.

करी प्रश्ना लडिवाळपणें बाळ
"अगे आई मळतेस काय बोल"?
सहज माध्या अव्याज सरळ बोलें
हृदय मातेचें मोदभरें डोले;

"होय मळते" कौतुकें माय बोले
"कुणासंगे गे राहशील बाले?
"मीहि मळतें" तुजसवें वदे बाळा
गहिंवरोनी घे माय चुंबनाला.

# गृहिणी

मधुरहास्यमुखी मधुभाषिणी
विहरते गृहिणी गुणभूषणी
विकसली सलिलींच मृणालिनी
विलसली गगनीं जणुं रोहिणी.

नयनिं रम्य खुले द्युति, आननीं
मिरविलें रवितें, जणुं मानिनी
वितरि हास्य तिचें सदनीं प्रभा
उदित होत उषा यदि कीं नभा

पडति मंद पदें गजगामिनी
तनुसुलंकृत सुंदर भामिनी
सुखद शांत निरामय ती कृती
कधिंहि ना रिघते मनिं विकृती.

कध न क्षोभ शिवे तिचिया मना,
असति तृप्त सदा मनकामना,
सदय अंतर तें नवनीतसें
नच दुजें मिळणें जगतीं तसें.

विविध त्या वरितें विपुला कला
रसिकही नमनीं तिज बाळका,
करि गुणें सुरमंदिर जी घरें
प्रमुदिनी गृहिणी गृहसुख्यते.

# जोडीदारास—

करि आदर का थोडासा कां इतुकी तुजसी हांव ?
तूं किर्तीमंत अंगि मोठा,
वैभवास नच तव तोटा,
परि जडलें माझ्या दैवें तव संगें मदिय नांव !
औदार्या सीमा नाहीं
तव विचार देती ग्वाही,
मग कशास इतुकी घाई ? पाकटका का स्वभाव ?
बहिरंगि उगी मन फसतें
सौंदर्य अंतरीं वसतें
तत्त्व तूं जगा शिकविलें तव ठायीं कां अभाव !
तुजसंगें आजवरीचें
जीवन मी कंठी साचें
आतांच कोठुनी आला तव हृदयीं बेबनाव ?
भूदेव अग्निच्या पुढतीं
घेतली प्रतिज्ञा माथीं,
धर्मार्थकाममोक्षाची काय तिचा हा प्रभाव ?
तूं सोडून अवचित देतां
राहील कोण मज त्राता
जन सारे बघतिल मौजा करितिल ते काव काव !
मज मोक्ष वसे आभाळीं
हा रौरव तैसा खालीं
अरि धरुनि उभयतां आऊं ना तरी रे ना निभाव !

# 'बंदिवान पोपटा'चें कवीस उत्तर

"गिरिगव्हरिं हिंडतां व्याध्र-शर अवचित बसतां उरीं
स्वातंत्र्याच्या तरल कल्पना विरतिल वाऱ्यावरी"
—कवि दत्तप्रसन्न कारखानीस.

भीति घालिशी व्याध-शरांची फिरतां गिरिगव्हरीं,
घरांत बसुनी, काय तुला ये मृत्यु टाळतां तरी ?

नको जिणें बंदिस्त पंजरीं, सोन्याच्या मंदिरीं,
स्वतंत्रतेनें जगणें सुखमय वाटे तरु कोटरीं.

पेरू, दाडिम, डाळ, कलिंगड यांची तुज माधुरी,
काय तयांचे स्वाद भक्षि जां रान फळें बहुपरी ?

मरंद मिश्रित वायू, शीतल जल जो प्राशन करी,
वाळयाच्या त्या कुजट जलाचें कोड कशाला तरी ?

वणवण फिरुनी वनांत उरलों अर्धउपाशी जरी
नको येथला घास फुकाचा कपटपटूंच्या करीं !

पुत्रवतीच्या प्रसववेदना वंध्येतें कधितरी—
कळतिल ! तेवीं गुलामास ती स्वतंत्रता माधुरी !

शतायु जीवन सुखासुखीचें, धिग् धिग् दास्यांतरीं.
स्वातंत्र्याचें बरवें त्याहुन सहस्रपट क्षणभरी

'जाम' तुला बहु 'प्यार' वाटते कींव तुझी मी करी
प्राणाहुनि प्रिय तुजला कांहीं कळेल का कधितरी ?

कळेल तेव्हां शत्रु-शरातें झेलशील तूं उरीं
स्वप्राणांना उधळुन देशिल तेव्हां वाऱ्यावरी !

# वस्तुसंग्रहांतील सिंहास

ज्याला पाहुनिया वनीं वनचरें थरकाप झाली मनीं
ज्याची ऐकुनि गर्जना गमत ये मृत्यूच आ वासुनी
तेजाचे अणुं गोल नेत्र स्फुरती, स्फुलिंग कीं तेवती
मुद्रा उग्र भयप्रदा खरतरा दाढा कराला किती.

भक्षावें मृगमांस मारुनि तया एकाच बाहू बळें
प्राशावें रुधिरा प्रमत्त करिचीं भेदोनि गंडस्थळें
स्नायूचें बळ केवढें, चपलता विद्युल्लतेच्या परी
स्वच्छंदें विहरे वनांत वनिचा राजा म्हणोनी हरी.

आतां आंत भरोनी तूस तुसती चर्माकृती ठेविली
नेत्रीं कांचमणी, निनाद कुठुनी ? ती चेतना लोपली,
स्नायूचें बळ कोठुनी ? रुधिर तें अंगांतुनी खोळणें
झालासे वनराज आज अबला–बालांप्रती खेळणें,

या मानीं मनिं खेद ही स्थिति तुझी झाली असे या जरी
आहों कंठित काळ आम्हिहि तसे जीवन्मृताच्या परी.

# तेव्हां आणि आतां

तेव्हां बाहुबळें पराक्रम करूं सम्राटसे शोभलों
दावाया अमुचा प्रताप अपुरी आम्हांस हो मेदिनी
किर्तीचा यशदुंदुभी दुमदुमे दाही दिशा लागुनी,
इंद्रातें करण्या पराजित तदा आम्ही उभे ठाकलों.

विद्या, वैभव, वित्त आणिक कला तें तेजही आगळें,
तेव्हां लोभविलें जगास सगळया कीं संस्कृतिच्या बळें,
वाटे श्रेष्ठ वसुंधरा प्रियतरा, स्वर्गास ना भाळलों
कर्तृत्वा करूनीच दिव्य जगतीं देवत्वही पावलों.

आतां हाय ! परंतु आज खपतों आम्ही हमालापरी
कष्टें राबतसूं तरी न मिळतें पोटा पुरी भाकरी;
गेलें तेज लया, पराक्रम तसा, झालों धना पारखे,
आहों कंठित जीवनास दुबळया जीवन्मृता सारखे,

तों देखून परंतु भारत नवा उत्साह वाटे मनीं,
सारे क्लेश करोनि दूर अमुचे, पाजील संजीवनी.

# सौंदर्यप्रतीति

गुलाब हांसे अस्फुट वदनीं
उषःकालच्या दंव बिंदूंनीं
जणूं सजविलें रत्नें त्यासी डोलत डौलें आनंदानीं !

अजुन न खुलला सुवर्णकिरणीं
मधुनिश्वासा सोडित गगनीं
काय पहुडला येथें वाटे साखर झोपेंमध्यें गुंगुनी !

सुषमा सुंदर मृदुल दलांची
सीमा संपे सौंदर्याची
वर्णांच्या त्या मृदुलपणासी उपमा व्हावी त्याच दलांची.

फूल पांखरूं फिरतें भिरभिर
या पुष्पाहुनि त्या पुष्पावर
स्तब्ध बसे क्षण पंख मिटोनी, मूर्तरूप आनंद मनोहर !

पंख रुपेरी किती मजेचे
वर ठिपकेही बहु रंगाचे
जाण असे का परी तयासी निज देहींच्या सौंदर्याची !

सुंदर सोज्वळ बाळ चिमुकलें
हास्य विमोहक वदनीं खुलकें
उल्हासाचे सिंचित सीकर, ज्ञान तयाचें पण त्या कुठलें !

झुळ झुळ वाहे निर्झर सुंदर
गीत गोड किति श्रवण मनोहर
तुषार उधळित रजतरसाचे स्वतःस जाणिव परी कोठवर !

जें जें वसतें नितांत सुंदर
मनोज्ञ मोहक आणि मनोहर
अगम्य तेथें बुद्धी केवळ मूर्तिमंत कीं तें परमेश्वर !

